**महिला व बाल विकास विभागांतर्गत राबविण्यात येणाऱ्या बालसंगोपन योजनेच्या सहायक अनुदानात वाढ करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-बालसं-२०२१/प्र.क्र.७६/का-०८**
नविन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक- १७ फेब्रुवारी, २०२३

**वाचा :-**

१) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक बालसं-२००५/प्र.क्र.९१/का-८, दि.११/११/२००५.
२) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक बालगृ-२०१८/प्र.क्र.१६/का-८, दि.२६/०२/२०१८.
३) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक बालसं-२०११/प्र.क्र.३१३/का-८, दि.०९/१०/२०१३.
४) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक-रिटपी-२०१८/प्र.क्र.२१०/का-०८, दि. ०६/०४/२०२१
५) मा.मंत्रीमंडळाच्या दि.३१/०१/२०२३ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त

**प्रस्तावना :-**

अनाथ, निराश्रित, बेघर व अन्य प्रकारे आपत्तीत असलेल्या (Crisis) बालकांचे संस्थाबाह्य व कौटुंबिक वातावरणात संगोपन व्हावे, या दृष्टीने सदर मुलांना संस्थेत दाखल करण्याऐवजी पर्यायी कुटूंब उपलब्ध करुन देणे व संस्थेतील वातावरणाऐवजी कौटुंबिक वातावरणात त्याचे संगोपन व विकास घडवून आणणे, या मुख्य उद्देशाने महिला व बाल विकास विभागामार्फत बाल संगोपन योजना राबविण्यात येते.

२. कोवीड-१९ या संक्रामक रोगाच्या काळात पालनकर्त्या कुटुंबाने बालकास उपलब्ध करुन द्यावयाच्या सुविधांकरिता महागाई निर्देशांकाच्या अनुषंगाने विचार करता वाचा क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये उपलब्ध करून देण्यात येत असलेले प्रतिमहा प्रतिबालक अनुदान पुरेसे ठरत नाही. यास्तव बालकांचे यथायोग्य पालनपोषण करण्यासाठी तसेच त्यांच्या आरोग्यविषयक व शैक्षणिक गरजा भागविण्यासाठी दरमहा पुरेशी रक्कम पालनकर्त्या कुटुंबास उपलब्ध करून देणे आवश्यक असल्याने बाल संगोपन योजनेअंतर्गत पालकास बालकांच्या संगोपनासाठी प्राप्त

होणाऱ्या परिपोषण अनुदानात व संस्थेस उपलब्ध करूण्यात येणारे प्रतिबालक प्रतिमहा अनुदानात वाढ करण्याची बाब विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

बाल संगोपन योजनेअंतर्गत बालकांच्या संगोपनासाठी पालकास प्राप्त होणाऱ्या परिपोषण अनुदानात रु.१,१००/- वरून रु.२,२५०/- व संस्थेस उपलब्ध करण्यात येणारे प्रतिबालक प्रतिमहा अनुदानात रु.१२५/- वरून रू.२५०/- अशी एकूण रु.२,५००/- इतकी वाढ करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. बाल संगोपन योजनेच्या सहायक अनुदानामध्ये उपरोक्तप्रमाणे होणारी वाढ दि.१ एप्रिल २०२३ पासून लागू होईल.

३. सदर बाबीवरील होणारा खर्च मागणी क्र.एक्स-०१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२, समाजकल्याण, १०२ बाल कल्याण, (१५) बाल संगोपन योजना (संगोपन व काळजी), (१५) (०१) बालसंगोपन योजनेसाठी स्वयंसेवी संस्थांना सहायक अनुदान (कार्यक्रम), (२२३५ B ९०६) या लेखाशिर्षाखाली उपलब्ध करण्यात येणाऱ्या वेतनेत्तर सहायक अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०२१७१२३३५७९५३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NILESH JANARDAN PATIL

Digitally signed by NILESH JANARDAN PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=b7f57a5d2af23fdb37cfec3c30cfe085ddbef06ea381e7e81401a472bbb966f7, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B7D8429F943427129A6A081EE223FEAC961CDD926C4D3542C55A470F22A7C7AE, cn=NILESH JANARDAN PATIL
Date: 2023.02.17 16:48:38 +05'30'

**( डॉ.निलेश ज.पाटील )**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई,
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई,
५) मा.सभापती/उपसभापती विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई,
६) मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ,मुंबई,
७) मा.मंत्री (म. व बा. वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
८) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे उपसचिव, मंत्रालय,मुंबई,

९) प्रधान सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०) प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय,मुंबई,
११) प्रधान सचिव ( व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२) प्रधान सचिव (ले. व को.), वित्त विभाग,मंत्रालय ,मुंबई,
१३) आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१४) महालेखापाल, १/२ (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखा परीक्षा), मुंबई / नागपूर,
१५) सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी,
१६) वित्त विभाग (व्यय-६), (अर्थ संकल्प-७), नियोजन विभाग (का.१४७२), मंत्रालय, मुंबई,
१७) सर्व कार्यासने महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१८) निवड नस्ती/का-८.